**यशवंतराव चव्हाण यमाई तलाव परिसर तुळशी वृंदावन उद्यान येथील कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.निसप्र-२०१६/प्र.क्र.९१/फ-५**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १० जानेवारी, २०१७

**वाचा** - १. अप्पर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य,नागपुर यांचे पत्र क्र. कक्ष -२४(३)/व अ/३८१/२०१६-१७, दि.०५/०८/२०१६.

**प्रस्तावना** -

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपुर यांनी दि.०५/०८/२०१६ च्या पत्रान्वये सोलापूर वन विभागांतर्गत पंढरपूर येथील तुळशी वृंदावन आणि चंद्रभागा नदीच्या काठाचे सुशोभिकरण करणे अंतर्गत पंढरपूर येथे यमाई तलावास रिटेंनिंग वॉल बांधने रु.१९८.३५ लक्ष तसेच तुळशी वृंदावन उद्यानामध्ये पादचारी मार्ग करणेच्या रु.८९.८२ लक्ष असे एकूण रु. २८८.१७ लक्ष रकमेच्या सादर केलेल्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सोलापूर वन विभागांतर्गत पंढरपूर येथील तुळशी वृंदावन आणि चंद्रभागा नदीच्या काठाचे सुशोभिकरण करणे या कामाअंतर्गत यमाई तलावास १९०.०० चल मीटर रिटेंनिंग वॉल बांधणे या कामासाठी रु.१९८.३५ लक्ष तसेच तुळशी वृंदावन उद्यानामध्ये ११०० चल मीटर पादचारी मार्ग करणे या कामाकरिता रु.८९.८२ लक्ष असे एकूण रु. २८८.१७ लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास विशेष बाब म्हणून खालील अटीच्या अधीन राहून, शासनाची प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे.

१) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घ्यावी.

२) सोलापूर वन विभागांतर्गत पंढरपूर येथे यमाई तलावास रिटेंनिंग वॉल बांधने आणि तुळशी वृंदावन उद्यानामध्ये पादचारी मार्ग करणेच्या कामासाठी उच्च व चांगल्या दर्जाचे साहित्याचा वापर करण्यात यावा. तसेच सदरहू कामाचे संरक्षण व परिरक्षणासाठी आवश्यक उपाययोजना करावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र. ७०/२००८/ विनियम, दि. १५ मे २००९ , वित्तीय अधिनियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग- पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.१, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०११०१७३२११३३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.01.10 17:40:10 +05'30'

**(प्रकाश महाजन)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य,नागपुर
२. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपुर
३. मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) पुणे.
४. उप वनसंरक्षक, सोलापूर वन विभाग, सोलापूर.
५. महालेखापाल,१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षण) मुंबई / नागपुर
६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
७. कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय,मुंबई-३२.
९. ब-१/फ-१/फ-२ कार्यासन ,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१०. कार्यासन फ-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ (निवड नस्ती )